आदिवासी क्षेत्र उपयोजना सन २०१५-१६ करीता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या योजनेत्तर तरतूदींचे खर्च करण्यास परवानगी देणेबाबत-महाराष्ट्र राज्य सहकारी जनजाती विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य (लेखाशीर्ष २४२५ ०७०१)

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.१/कार्यासन-६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२.
तारीख: १९ ऑक्टोबर, २०१५

वाचा -

१) **वि.वि.शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थ-३, दि. ३०.०३.२०१५**
२) **शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.०१/कार्यासन-६, दि.०७.०४.२०१५**
३) **वि.वि.शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५**
४) **वि.वि.शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५, दि.२४.०७.२०१५**
५) **आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. आविम १०१५/प्र.क्र.९३/का.३**

## शासन निर्णय-

आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाकरीता योजनेत्तर योजनेसाठी मागणी क्र.टी-२ मुख्य लेखाशीर्ष २४२५, सहकार-१०८, इतर सहकारी संस्थाना सहाय्य (००) (०१) महाराष्ट्र राज्य सहकारी जनजाती विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य (२४२५ ०७०१) याकरीता ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) साठी रु.२५७.९९ लक्ष व ३६, सहायक अनुदाने (वेतन) यासाठी रु.५०१८.८१ लक्ष अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. या अर्थसंकल्पित निधी पैकी वाचा येथील क्र.५ नुसार विभागाच्या प्रस्तावास अनुसरुन ७०% निधी म्हणजेच ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) याकरीता रु.१८०५९ लक्ष व ३६, सहायक अनुदाने (वेतन) यासाठी रु. ३५१३.१५ (लक्ष) इतकी तरतूद नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वाचा क्र.३ मधील अटी व शर्तीची पूर्तता करत असल्याने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत तरतूद खर्च करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रक अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उदिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठविण्याबाबत सूचना देण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने वाचा क्र.३ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१९१७५०३३७१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2015.10.19 17:53:01 +05'30'

**भगवान सावंत**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
४. सर्व सहसचिव / उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय ग्रंथाल, विधानभवन, मुंबई.
७. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/साऊ), मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११.निवडनस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.